**महाराष्ट्र होमगार्ड कल्याण व लोकहितैषी नियमात सुधारणा करुन निधीत वाढीव अंशदान करण्याबाबत व अखिल भारतीय व्यवसायीक क्रिडा स्पर्धाचे आयोजन करण्यासाठी तरतूद करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- एचजीएस २२०७/प्र.क्र. २०८/विशा-८**
**मंत्रालय, मुंबई-४०००३२. दिनांक ३० जुलै, २००९.**

**वाचा :-** १) शासन निर्णय गृह विभाग क्र.एचजीएस ३६९४/९४२(५८) /विशा-८, दिनांक ७/७/१९९९.
२) होमगार्ड मुख्यालयाचे पत्र क्र.मस/कार्या-३/०७/२३७२, दिनांक २७/७/२००७

**प्रस्तावना :-**

कायदा व सुव्यवस्था राखण्यासाठी तसेच नैसर्गिक व मानव निर्मित आपत्तीच्यावेळी पोलिसांना होमगार्ड संघटनेतील स्वयंसेवकांकडून मोलाची मदत करण्यात येते. सदर संघटनेत काम करणारे स्वयंसेवक हे मानसेवी असून त्याना मानधन दिले जाते. त्याना शासकीय कर्मचा-यांप्रमाणे कोणतेही लाभ देण्यात येत नाहीत. स्वयंसेवक कर्तव्य करित असताना, त्यांना मृत्यू आल्यास किंवा विकलांगता आल्यास त्यांना व त्यांच्या वारसाना अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्यासाठी संदर्भाधीन क्र.१ येथील दि.७/७/१९९९ च्या शासन निर्णयान्वये महाराष्ट्र होमगार्ड कल्याण व लोकहितैषी निधीची स्थापना करण्यासाठी नियमावली विहित करण्यात आली आहे. राज्यातील एकूण होमगार्डची लक्ष संख्या ५६१०० विचारात घेऊन या निधीमध्ये प्रत्येक होमगार्डमागे केंद्र शासन व राज्य शासनाकडून प्रति वर्षी रुपये ७.५० अंशदान केले जाते.

या निधीची स्थापना होऊन २० वर्षाचा कालावधी लोटलेला आहे. त्या निधीत जमा होणारी रक्कम विचारात घेऊन कर्तव्य बजावत असतांना मृत्यू/जखमी झाल्यास् उक्त नियमांन्वये संबधीताना जे अर्थसहाय्य मंजूर करण्यात येते ते अपुरे असल्याने त्यात वाढ करण्यासाठी होमगार्ड संचालनालयाने महाराष्ट्र होमगार्ड कल्याण व लोकहितैषी निधीच्या नियमात सुधारणा करण्याचा प्रस्ताव शासनास दिनांक २७/७/२००७ च्या पत्रान्वये सादर केलेला आहे.

२. याशिवाय अखिल भारतीय होमगार्ड व नागरी संरक्षण संचालनालयामार्फत व्यवसायीक क्रिडा स्पर्धाचे आयोजन प्रती वर्षी केले जाते. या स्पर्ध्येमध्ये शस्त्र कवायत, नेमबाजी, फर्स्ट एड, रेस्क्यू, अग्निशामन, शारिरिक कवायती तसेच क्रिडा प्रकारामध्ये कबड्डी, हॉकी, फुटबॉल, व्हॉलीबॉल इत्यादीचा समावेश असतो. त्यासाठी होमगार्डची तयारी करण्याच्या दृष्टीने ४ विभागीय पातळीवर व १ राज्य पातळीवर क्रिडा स्पर्धा आयोजीत केल्या जाऊन व ॲथलॅटिक क्रिडा स्पर्धा फक्त राज्य पातळीवरच घेऊन उत्कृष्ट महाराष्ट्र होमगार्ड संघ तयार करण्यासाठी रुपये २५.०० लक्ष तरतूद उपलब्ध करुन महाराष्ट्र होमगार्ड कल्याण व लोकहितैषी निधीच्या नियम क्रमांक ४ ब मध्ये क्रिडा व रोख बक्षिसे हे उद्दीष्ट नव्याने समाविष्ट करुन नियमात दुरुस्ती करण्याच्या अनुषंगाने देखील संचालनालयाने संदर्भाधीन पत्रान्वये शासनास प्रस्ताव सादर केला आहे. हे दोन्ही प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होते.

**शासन निर्णय :-** वरील प्रस्तावाच्या अनुषंगाने मंत्रीमंडळाच्या दिनांक २५ फेब्रुवारी २००९ रोजी झालेल्या बैठकीत, मंत्रीमंडळाने दिलेली मान्यता विचारात घेता महाराष्ट्र होमगार्ड कल्याण व लोकहितैषी निधीच्या नियमात खालील प्रमाणे सुधारणा करण्यास याव्दारे शासन मान्यता देण्यात येत आहे.

(१) महाराष्ट्र होमगार्ड कल्याण व लोकहितैषी नियम १९९९ मधील नियम क्रं.४(अ) नुसार कर्तव्यार्थ असताना मृत्यू पावलेल्या होमगार्डच्या वारसाना त्यांनी होमगार्डमध्ये केलेली सेवा विचारात घेवून जी रक्कम मंजूर करण्यात येत होती. त्यातील सेवेची अट काढुन सरसकट शासन याव्दारे होमगार्ड सेवेत कर्तव्यार्थ असताना मृत्यू पावलेल्या होमगार्डच्या वारसाना रु. २,००,०००/- देण्यात यावी.

(२) उपरोक्त नमूद केलेल्या नियमावलीत नियम ४(अ) (२) नुसार कर्तव्यार्थ / प्रशिक्षणार्थ असताना होमगार्डना कायम व तात्पूरती विकलांगता आल्यास अनुक्रमे रु.२५,०००/- व रु. ५०००/- देण्याची तरतुद करण्यात आली आहे. त्या ऐवजी कर्तव्यार्थ असताना कायम /तात्पूरती विकलांगता आल्यास अनूक्रमे रु.२,००,०००/- (रुपये दोन लाख फक्त ) व रु.५०,०००/- ( रुपये पन्नास हजार फक्त ) देण्यात यावे, या शिवाय कर्तव्यार्थ असताना जखमी झालेल्या होमगार्डना औषधोपचारासाठी झालेल्या खर्चाची रक्कम देण्यात यावी.

(३) उपरोक्त नियमावलीतील नियम ४(अ) (३) मधील तरतुदीनुसार कर्तव्यार्थ / प्रशिक्षणार्थ असताना विस्थापित परिस्थितीत सापडलेल्या होमगार्डना देय असलेल्या रु.२०००/- या रक्कमे ऐवजी रु. ४०००/- इतकी रक्कम देण्यात यावी.

(४) उपरोक्त नियमावलीतील नियम ४(अ) ४ नुसार मृत्यू पावलेल्या / किंवा विकलांगता आलेल्या होमगार्डच्या दोन मुलांना शैक्षणीक प्रयोजनार्थ लागणारे साहित्य खरेदी करण्यासाठी प्रत्येक मुलांना शालेय शिक्षणासाठी रु. ३००/-ऐवजी व रु.६००/- व महाविद्यालयीन शिक्षणासाठी रु.६००/- ऐवजी रु.१२००/- इतकी रक्कम देण्यात यावी.

(५) उपरोक्त नियमावलीतील नियम ४(अ) (५) नुसार मृत होमगार्डच्या कुंटुबीयांना उदरनिर्वाहाचे साधने उपलब्ध करुन देण्यासाठी सध्या देत असलेल्या रु ३०००/- एवढया रकमेऐवजी रु. १०,०००/- इतकी रक्कम देण्यात यावी.

२.	उपरोक्त नियमावलीतील नियम ४(ब) (२) नंतर खालील प्रमाणे नियम ४(ब) ३ व ४(ब) ४ अंर्तभूत करण्यात यावेत :-

**४(ब)३.** जिल्हा प्रशिक्षण केंद्र / तालुका पथक ठिकाणी होमगार्डसाठी कल्याण केंद्र उभारण्यासाठी उदा. शिलाई केंद्र /हस्तकला / सूतारकाम इत्यादीसाठी प्रत्येक जिल्हयाकरिता रु.१०,०००/- इतकी रक्कम देण्यात यावी.

**४(ब)४.** विभागीय पातळीवर शस्त्र कयावती / नेमबाजी फस्ट एड /रेस्क्यु / अग्निशामन शारिरीक कवायती ( कबड्डी , हॉकी , फुटबॉल , हॉलीबॉल ) यांच्या स्पर्धा व राज्य पातळीवरील स्पर्धासह ॲथेलेटीक्स आयोजीत करण्यासाठी व बक्षीसे देण्यासाठी खर्च देण्यात यावा.

३.	वरीलप्रमाणे क्र. १ ते ५ येथील सुधारणा अंमलात आणण्यासाठी प्रती होमगार्ड रु. १५/- ऐवजी रु. ४०/- या प्रमाणे अंशदानाचे दर विहित करण्यात येत आहेत.

४.	तसेच स्पर्धाचे आयोजन करणे व बक्षिस देण्यासाठी एक वेळची बाब म्हणून रु.२५ लाख इतकी रक्कम देंण्यास मान्यता देण्यात येत आहे.

५.	वरील परिच्छेद ३ व ४ येथील सर्वबाबीच्या अनूषंगाने होणारा खर्च "मागणी क्र. बी-१ क्र.:- २०७० इतर प्रशासनिक सेवा १०७ होमगार्ड-(००)(०१)- ३२-अंशदान" या लेखाशिर्षाखाली सन २००९-२०१० या वर्षी पावसाळी अधिवेशनात पुरवणी मागणीद्वारे मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा व तो त्या प्रधान शिर्षाखाली दर्शविण्यात यावा. अंशदानाची रक्कम देण्याच्या दृष्टीकोनातुन दरवर्षी नियमीत तरतूद करण्याची कार्यवाही करण्यात यावी.

६. हे आदेश, वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. प्र.क्र.१५६/०९/व्यय-८ दिनांक.१९.५.०९ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहेत.

७. हा शासन निर्णय राज्य शासनाच्या वेब साईटवर उपलब्ध करण्यात येत असून त्याचा संगणक संकेतांक क्र. २००९०७३११८१६१२००१ असा आहे.

महाराष्ट्रचे राज्यपाल यांचे आदेशनुसार व नावाने

(सदानंद जाधव.)

उप सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.

प्रति,

मा.उपमुख्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
मा.राज्यमंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव.
मुख्य सचिव यांचे कार्यालय.
अ.मु.स. (गृह) यांचे स्वीय सहाय्यक.
प्रधान सचिव, (विशेष) यांचे सवीय सहाय्यक.
महासमादेशक, होमगार्ड व संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
महासंचालक, माहिती व जनसंपर्क विभाग,मंत्रालय,(प्रसिध्दीसाठी).
सर्व जिल्हा पोलीस अधिक्षक/अप्पर पोलीस अधिक्षक.
सर्व जिल्हा जनसंपर्क अधिकारी (प्रसिध्दीसाठी)
समादेशक, होमगार्ड, मुंबई, बृहन्मुंबई.
सर्व जिल्हा समादेशक, होमगार्ड.
समादेशक, मध्यवर्ती प्रशिक्षण संस्था, होमगार्ड, घाटकोपर, मुंबई.
सर्व होमगार्ड परिमंडळ
सर्व होमगार्ड परिक्षेत्र बृहन्मुंबई
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.

महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
वित्त विभाग, व्यय-८, मंत्रालय, मुंबई.
गृह विभागातील सर्व कार्यासने.
संगणक कक्ष , गृह विभाग, मंत्रालय.शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्याबाबत कार्यवाहीसाठी अग्रेषित.
निवड नस्ती विशा-८.